पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठीच्या खर्चास मंजुरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक-मपुवि-२०१९/प्र.क्र.८६/सां.का.२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :** (१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जूलै, २०१९.
(२) संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र.बासंका-९०/ प्रतिचित्रण/सुक्ष्मचित्रिकरण/ २०१९-२०/२८२०, दि.३० ऑगस्ट, २०१९ व ३३४२, दि. १३ नोव्हेंबर, २०१९.

**शासन निर्णय -**

पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण व स्कॅनिंग करण्यासाठी अर्थसंकल्पात सन २०१९-२० या वित्तीय वर्षात रु.३,००,००,०००/-(अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण बाहेरील संस्थांकडून करुन घेण्याच्या अनुषंगाने निविदा प्रक्रीया राबविली आहे. आता या शासन निर्णयान्वये पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी रु.१,९०,००,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी नव्वद लाख फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

तसेच **रु.१,१४,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चौदा लाख फक्त)** इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०३.** हा शासन निर्णय विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग- तीन, अ.क्रं. ०४ परिच्छेद क्रं. २७ (२) नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं -२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जूलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** यासाठीचा होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२,२२०५ कला व संस्कृती, १०४, पुराभिलेख, (०१) (०३) पुराभिलेख कार्यालय (२२०५ १८०१) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२८१७०९४३०१२३ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism and Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b87d4d4fe12b58aa774e6d5a46d4e107c68149390bcfbc86a5293668bb39aa80, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2019.12.04 12:50:09 +05'30'

**(अनिस शेख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
२. मुख्य छायाचित्रकार, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा),मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. कार्यासन अधिकारी, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, सां.का.२.